शासकीय कर्मचा-यांची नियत सेवावधीपूर्वी सेवानिवृत्ती

---

वयाच्या ५०/५५ वर्षापलीकडे/अर्हताकारी सेवेच्या ३० वर्षाच्या कालावधीपुढे सेवेत रहाण्याची शासकीय कर्मचा-यांची पात्रापात्रता अजमाविण्याचा निकष .....

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
परिपत्रक क्रमांक एसआरसी-१०८५/१०२९/४३/पंधरा
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२ दिनांक १ एप्रिल १९८९

संदर्भ :- १] शासन परिपत्रक, क्रमांक एसआरसी-१०७७/पंधरा, दिनांक २.९.१९७७
२] शासन परिपत्रक, क्रमांक एसआरसी-१०८२/९५२/पंधरा, दि. १.९.१९८३
३] शासन परिपत्रक, क्रमांक एसआरसी-१०८२/९५२/पंधरा, दि. ३०.११.१९८४
४] शासन परिपत्रक, क्रमांक एसआरसी-१०८५/१०२९/४३/पंधरा, दि. १२.५.१९८६

परिपत्रक :- राज्य शासकीय कर्मचा-यांची वयाच्या ५०/५५ व्या वर्षापलीकडे सेवेत रहाण्याची पात्रापात्रता अजमाविण्याचे सुधारित निकष शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरसी-१०८५/१०२९/४३/पंधरा, दि. १२ मे, १९८६ अन्वये विहित करण्यात आले आहेत. वर्ग १ व वर्ग २ च्या राजपत्रित अधिका-यांच्या बाबतीत ५० वर्षे पूर्ण होतेवेळी किंवा अर्हताकारी सेवेची ३० वर्षे पूर्ण होतेवेळी, यापैकी जे प्रथम घडेल त्यावेळी, करावयाच्या त्यांच्या पुनर्विलोकनाचा निकष, शारीरिक क्षमता, निर्विवाद सचोटी व "चांगला" पेक्षा कमी नाही. असा अभिलेख हा विहित करण्यात आला आहे. वर्ग ३ व वर्ग ४ च्या कर्मचा-यांच्या बाबतीतही वयाच्या ५५ व्या वर्षी करावयाच्या पुनर्विलोकनासाठी शारीरिक क्षमता, निर्विवाद सचोटी व "चांगला" पेक्षा कमी नाही असा अभिलेख हा निकष विहित करण्यात आला आहे. वर्ग ३ व वर्ग ४ च्या कर्मचा-यांबाबत अर्हताकारी सेवेची ३० वर्षे पूर्ण होतेवेळी करावयाच्या पुनर्विलोकनासाठीही हाच निकष शासनाने ठरविला आहे. तथापि त्याबाबत परिपत्रकात स्पष्ट उल्लेख नसल्याने शासनाकडे अर्हताकारी सेवेची ३० वर्षे पूर्ण केलेल्या वर्ग ३ व वर्ग ४ च्या अधिका-यांच्या पुनर्विलोकनासाठी कोणते निकष विहित करण्यात आले आहेत अशी विचारणा मंत्रालयीन विभाग तसेच विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख यांच्याकडून करण्यात येत असते.

२. तरी सर्व संबंधितांच्या माहितीसाठी स्पष्ट करण्यात येत आहे की, वर्ग ३ व वर्ग ४ च्या कर्मचा-यांच्या वयाच्या ५५ व्या वर्षी करावयाच्या पुनर्विलोकनासाठी

विहित करण्यात आलेला शारीरिक क्षमता, निर्विवाद सचोटी व "चांगला" पेक्षा कमी नाही असा अभिलेख हाच निकष त्यांच्या अर्हताकारी सेवेची ३० वर्षे पूर्ण होतेवेळी करावयाच्या पुनर्विलोकनासाठी विहित करण्यात आलेला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

मु. स. मोकाशी,
सह सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपाल यांचे सचिव,
मुख्यमंत्री यांचे सचिव,
सर्व मंत्र्यांचे स्वीय सहायक,
सर्व राज्यमंत्र्यांचे स्वीय सहायक,
शासनाचे सर्व सचिव,
मंत्रालयाच्या विभागांतर्गत सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
मंत्रालयाचे सर्व विभाग,
निवड फाईल.

-----

एच-३४ [३५००-४-८९]